**सुधागड एज्युकेशन सोसायटी, पाली, जि.रायगड संचलित धाटाव औद्योगिक विद्यालय, धाटाव, ता.रोहा, जि.रायगड या शाळेचे एम.बी.मोरे फाऊंडेशन, धाटाव, जि.रायगड या संस्थेस हस्तांतर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्राशाह ३०१८/प्र.क्र.३९९/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १८ जानेवारी, २०१९

<u>वाचा :</u> शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक माशाह २०११/ (२१०/११) माशि-३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२

<u>संदर्भ :</u> विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई यांचे क्र.शिउसं/प्राथ-१/हस्तांतरण/प्र.क्र.२०१८/७९२-९५, दिनांक १८ जून, २०१८ चे पत्र.

<u>प्रस्तावना :</u>

सुधागड एज्युकेशन सोसायटी, पाली, जि.रायगड संचलित धाटाव औद्योगिक विद्यालय, धाटाव, ता.रोहा, जि.रायगड (डि.ए.इंग्लिश मिडियम स्कूल, धाटाव, ता.रोहा, जि.रायगड) या इंग्रजी माध्यमाच्या कायम विनाअनुदानित प्राथमिक व उच्च प्राथमिक शाळेचे, एम.बी.मोरे फाऊंडेशन, धाटाव, जि.रायगड या संस्थेस हस्तांतर करण्याचा संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

<u>शासन निर्णय :</u>

सदर प्राथमिक व उच्च प्राथमिक शाळेचे, एम.बी.मोरे फाऊंडेशन, धाटाव, जि.रायगड यांचेकडे हस्तांतर करण्यास खाली नमूद अटी व शर्तीवर मान्यता देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

(१) व्यवस्थापन बदल झालेल्या शाळेची कोणत्याही कारणास्तव किमान पटसंख्येची अट शिथील केली जाणार नाही.

(२) बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ नुसार व शाळेसाठी शासनाकडून वेळोवेळी देण्यात येणाऱ्या आदेशानुसार शाळेस पक्की इमारत, सर्व भौतिक सुविधा व शैक्षणिक सुविधा उपलब्ध करून देण्यात येतील याबाबत नवीन संस्थेचे अध्यक्ष/ सचिवांचे रू.१००/- च्या स्टँम्पपेपवर नोटरी केलेले शपथपत्र सादर करणे आवश्यक राहील.

(३) शाळेतील हस्तांतरणास संमती दिलेल्या अर्हता प्राप्त शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सामावून घेण्यात येईल व त्यांच्या सेवाशर्तीमध्ये बदल होणार नाही. याबाबत नवीन संस्थेचे अध्यक्ष/सचिवांचे रू.१००/- च्या स्टँम्पपेपरवर नोटरी केलेले शपथपत्र सादर करणे आवश्यक राहील.

(४) सुधागड एज्युकेशन सोसायटी, पाली, जि.रायगड संस्थेचे कोणत्याही विषयाबाबत कोणत्याही न्यायालयात न्यायप्रविष्ट प्रकरण प्रलंबित नसल्याबाबत संस्थेचे अध्यक्ष/सचिवांचे रू.१००/- च्या स्टँम्पपेपरवर नोटरी केलेले शपथपत्र सादर करणे आवश्यक राहील.

(५) सदर शाळेचे नाव, “औद्योगिक विद्यालय, धाटाव” अथवा “एम.बी.मोरे फाऊंडेशन इंग्लिश मिडियम स्कूल” अथवा “डि.ए. इंग्लिश मिडियम स्कूल” आहे, याबाबत तपासणी करून योग्य नाव नमूद करावे. तसेच शाळेच्या

नावात बदल केल्याबाबतची नोंद घेतल्याचे विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई यांनी खात्री करणे आवश्यक राहील.

(६) सदर शाळा अनुदानाच्या ज्या तत्वावर आहे, त्याच तत्वावर हस्तांतरणानंतरही कार्यरत राहील.

(७) शाळेतील विद्यार्थ्यांच्या आधारकार्डची झेरॉक्स प्रत किंवा आधारक्रमांकाची यादी सादर करणे आवश्यक राहील.

(८) व्यवस्थापन बदल झालेल्या शाळेच्या बाबतीत शासन परवानगीच्या/ मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाही याची खबरदारी घेण्यात यावी.

(९) सदर इंग्रजी माध्यमाची शाळा कायम विनाअनुदानित असल्याने शाळेत कार्यरत शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे संपूर्ण दायित्व संस्थेवर राहील.

(१०) शासनाकडून शाळा, शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/ वेतनेतर अनुदान, विद्यार्थी इ. बाबत वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ. चे पालन करणे नवीन संस्थेस बंधनकारक राहील.

(११) सदर व्यवस्थापन बदल, शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक माशाह २०११/(२१०/११) माशि-३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२ मध्ये विहित केलेल्या नियमानुसार व कार्यपध्दतीनुसार अंमलात येईल.

(१२) सदरहू व्यवस्थापन बदलासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे कोणत्याही प्रकारच्या तक्रारी प्राप्त झाल्यास किंवा व्यवस्थापन बदल संदर्भातील अटी व शर्तीचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास किंवा व्यवस्थापन बदलापूर्वीच्या संस्थेतील कार्यरत शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या सेवाशर्तीचा नवीन संस्थेव्दारा भंग झाल्यास, हस्तांतरण रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. वरील अट क्र.(२), (३), (४), (५) व (१२) ची पूर्तता झाल्यावर विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई यांनी सर्व बाबी तपासून आणि आवश्यक अन्य अटींचा समावेश करून, शाळेचे व्यवस्थापन बदलाबाबत आवश्यक पुढील कार्यवाही करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११८११३३१८५७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2019.01.18 11:37:49 +05'30'

**( प्रविण मुंढे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई
३) शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, रायगड
४) अध्यक्ष/ सचिव, सुधागड एज्युकेशन सोसायटी, पाली, जि.रायगड
५) अध्यक्ष/ सचिव, एम.बी.मोरे फाऊंडेशन, धाटाव, जि.रायगड
६) निवडनस्ती (एसएम-१).